**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : आगास २०१०/प्र.क्र.४४/जल-८,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक :- ३ जून, २०१०.**

**वाचाः-**

१. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.आगास-२००८/प्र.क्र.७/जल-८, दिनांक १३.३.२००८.
२. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.आगास-२००९/प्र.क्र.२३/जल-८, दिनांक ७.५.२००९ व दिनांक ५.११.२००९
३. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंदाज-२०.१०/सीआर-६५/अर्थसंकल्प-३, दिनांक ३.४.२०१०.
४.शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.असक-२०१०/प्र.क्र.३२/जल-११, दिनांक ८.४.२०१०.
५. कृषि उपसंचालक, आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समिती, पुणे यांचे क्र.आगास/कॅशपलो/१०-११/३४७/२०१०, दिनांक २८.४.२०१० चे पत्र.

**प्रस्तावना:-**

आदर्श गांव संकल्प व प्रकल्प योजना लोकसहभागातून ग्राम विकास या संकल्पनेवर आधारीत आहे. गावाच्या सर्वांगिण विकासाच्या दृष्टीने शासनाच्या विविध योजना या गावामध्ये राबविण्यात येतात. यामध्ये प्रामुख्याने शासनाच्या १२ निरनिराळया विभागांच्या एकूण ५९ योजनांचा समावेश आहे. त्यापैकी पाणलोट क्षेत्र विकासाचे काम हे गाभा क्षेत्र म्हणून आणि इतर विभागाचे काम हे बिगर गाभा क्षेत्र म्हणून वर्गीकरण करण्यात आलेले आहे. तसेच या योजनेच्या अंमलबजावणीसाठी आणि सनियंत्रणासाठी राज्यस्तरीय समिती गठीत करण्यात आलेली आहे.

१.१ उपरोक्त योजनेंतर्गत एकूण २०१ गावांची निवड करण्यात आली असून सदर गावांच्या विकासासाठी जलसंधारण/पाणलोट क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत प्रामुख्याने बांधावरील वृक्षलागवड, सलग समतल चर, दगडाचे बांध, लहान मातीचे बांध, फांद्यांचे बांध, लहान काटयाचे बांध, माती नालाबांध, सिमेंट नालाबांध आणि जमिन सपाटीकरण (भातखाचरे) या कामांचा समावेश आहे. याकरीता योजनेअंतर्गत असलेल्या तरतूदीतून निधी उपलब्ध करण्यात येतो. त्याचप्रमाणे आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समितीच्या कार्यालयीन खर्चाकरीताही या योजनेअंतर्गत निधी देण्यात येतो.

१.२ गावाच्या सर्वांगिण विकासाच्या दृष्टीने शासनाने या योजनेस वेळोवेळी मुदतवाढ दिलेली असून, संदर्भिय अनुक्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये आदर्शगांव समितीची मुदत शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत वाढविण्यांत आली आहे. सन २०१०-११ मध्ये या समितीच्या कार्यालयीन खर्चाकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

.......२/-

**शासन निर्णय :-**

आदर्श गांव विकास योजना / कार्यक्रमांतर्गत चालू आर्थिक वर्षासाठी (सन २०१०-२०११) आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समिती, पुणे यांना योजनेअंतर्गत पाणलोट आधारित मृदसंधारण विषयक कामे व कार्यालयाच्या दैनंदिन कामकाजासाठी प्रामुख्याने दूरध्वनी, पेट्रोल/तेल/वंगण, विद्युतदेयके, कार्यालयीन खर्च आदर्शगांव मासिक छपाई इ. आकस्मिक खर्चासाठी मंजूर तरतूद रु.२०००.०० लाख मधून रु.२.०० लाख (रुपये दोन लाख फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. हा निधी खर्च करण्यास आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. या बाबतचा खर्च सन २०१०-११ च्या अंदाजपत्रकात खालील लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यांत यावा आणि "मागणी क्र.एल-७. ४४०२-मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च १०२-मृदसंधारण, १०२ (दोन) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनंतर्गत योजना, १०२ (०१) (१५) आदर्श गांव विकास कार्यक्रम (४४०२१०८६) , ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक ३ येथील दि.३ एप्रिल, २०१० च्या शासन परिपत्रकाअन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा सांकेताक क्र. २०१००६०३१४०६२०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रेखा भिडे )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे. (३ प्रती )
संचालक (मृदसंधारण) कृषि आयुक्तालय, पुणे-१ (३ प्रती)
कृषि उपसंचालक, आदर्श गांव संकल्प व प्रकल्प समिती, कृषि भवन, शिवाजीनगर, पुणे-५. (५ प्रती )
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परीक्षा / लेखव व अनुज्ञेयता )मुंबई / नागपूर. (३ प्रती )
अधिदान व लेखाधिकारी /निवासी लेखापरीक्षा, मुंबई, (३ प्रती )
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे. (३ प्रती )
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
कार्याध्यक्ष, आदर्शगांव संकल्प वं प्रकल्प समिती, पुणे.
सर्व सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी/ जल-११, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन जल-८ (निवड नस्ती), ग्रांम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.